**मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गतच्या मंडळ कार्यालयातील बांधकाम कार्यप्रकारातील १ विभाग व ८ उप विभागीय कार्यालये सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, अस्तित्वातील व नवीन सिंचन शाखा कार्यालये जोडून सातारा सिंचन मंडळ, सातारा अंतर्गत कार्यान्वित करुन विभागीय कार्यालयांची फेररचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१७/प्र. क्र.१/२०१७/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १२ मे, २०१७.

वाचा :
१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८.३.१९८४.
२) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक: एमआयएस-१०९०/६५/९०/आ.(क्षेप्र.), दि. १/७/१९९१.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: क्र.आढावा १००२/३३५/२००२/आ (प्रशि), दि.६/२/२००३.
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा-२०१६/प्र.क्र.२३७/२०१६/सिं.व्य.(म.).

प्रस्तावना -

सातारा जिल्ह्यात मोठे, मध्यम व लघु पाटबंधारे तसेच उपसा सिंचन इ. एकूण १७६ प्रकल्प असून त्यापैकी पूर्ण झालेले ११७ (कोयना जलविद्युत प्रकल्प धरुन) व ५९ बांधकामाधीन प्रकल्प आहेत. पूर्ण प्रकल्पांपैकी काही प्रकल्पांचे सिंचन व्यवस्थापन धोम पाटबंधारे विभाग, सातारा यांचेमार्फत तर काही प्रकल्पांचे बांधकाम व व्यवस्थापन सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचे अंतर्गत आहे. याद्वारे १९६.२७ द.ल.घ.मी. (TMC) प्रकल्पिय पाणीसाठा असून १९३.२७ द.ल.घ.मी. पाणी साठा निर्माण झाला आहे. सर्व प्रकल्पांची एकत्रित सिंचन क्षमता (ICA) ४.१४ लक्ष हेक्टर असून पैकी निर्मिती सिंचन क्षेत्र २.१५ लक्ष हेक्टर इतके आहे. तसेच, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गत हस्तांतरण करावयाचे निर्मित सिंचन क्षेत्र ४६,२०८ हेक्टर इतके आहे. अन्य मंडळाकडील सातारा जिल्ह्यातील ३१,७४३ क्षेत्र व सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचे अंतर्गत ४६,२०८ लक्ष हेक्टर क्षेत्रासाठी मिळून एक नवीन सिंचन विभाग स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने सातारा जिल्ह्यातील एकूण १,४९,२१८ हेक्टर सिंचन क्षेत्रासाठी १ विभाग, ८ उपविभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, **एकूण ५४ शाखा कार्यालयांसह (३२**

**अस्तित्वातील व २२ नवीन शाखा पदांशिवाय)** निर्माण करुन सातारा सिंचन मंडळ, सातारा अंतर्गतच्या कार्यालयांची फेररचना करण्याकरीता शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सातारा सिंचन मंडळ, सातारा अंतर्गत सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत होणाऱ्या कार्यालयांसाठी तसेच मंडळांतर्गत अस्तित्वातील इतर कार्यालयांच्या फेररचनेस पुढील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

- सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतचा कण्हेर विकास विभाग, सातारा हा बांधकाम कार्यप्रकारातील विभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन सातारा सिंचन विभाग, सातारा या नांवाने सातारा सिंचन मंडळ, सातारा अंतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे.
- सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतच्या धोम बलकवडी प्रकल्प विभाग, वाई अंतर्गतचे धोम बलकवडी प्रकल्प उपविभाग क्र.३, वाई व धोम बलकवडी प्रकल्प उपविभाग क्र.२, फलटण तसेच कण्हेर विकास विभाग, सातारा अंतर्गतचा कण्हेर भूविकास उपविभाग, रहिमतपूर हे तीन बांधकाम कार्यप्रकारातील उपविभाग अनुक्रमे धोम बलकवडी सिंचन उपविभाग क्र.१, वाई, धोम बलकवडी सिंचन उपविभाग क्र.२, फलटण व उपसा सिंचन उपविभाग क्र.१, रहिमतपूर या नांवाने सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत करुन सातारा सिंचन विभाग, सातारा अंतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे..
- उपरोक्त रुपांतरीत विभागांतर्गत एकूण २३ सिंचन शाखांपैकी १२ नवीन सिंचन शाखा पदांशिवाय व ११ अस्तित्वातील शाखा पदांसह कार्यान्वित करण्यात येत आहे.
- सातारा सिंचन मंडळांतर्गतच्या धोम पाटबंधारे विभाग, सातारा या सिंचनासाठी अस्तित्वातील विभागाच्या नांवात बदल करुन कृष्णा सिंचन विभाग, सातारा या नावाने त्याच मंडळांतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे.
- सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतच्या कण्हेर विकास विभाग, सातारा या विभागांतर्गतचे कृष्णा शेतचारी अस्तरीकरण उपविभाग, सातारा व दुष्काळी भाग लघु पाटबंधारे (सर्वे) उपविभाग क्र.१, वडुज या बांधकाम कार्यप्रकारातील उपविभागांचे सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरण करुन अनुक्रमे उरमोडी सिंचन व्यवस्थापन उपविभाग,

सातारा व उरमोडी सिंचन उपविभाग, वडुज या नांवाने कृष्णा सिंचन विभाग, सातारा अंतर्गत कार्यान्वित करण्यात येत आहे.

- विभागांतर्गत २० शाखांपैकी नवीन ५ शाखा पदांशिवाय निर्माण करुन अस्तित्वातील १५ शाखा पदांसह कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- सातारा सिंचन मंडळांतर्गतच्या कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर या सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारातील विभागाच्या नांवात कोयना सिंचन विभाग, कोयनानगर असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- सातारा सिंचन मंडळांतर्गतच्या कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर या विभागांतर्गतच्या कोयना पुनर्वसन उपविभाग क्र.२, सातारा व कोयना पुनर्वसन उपविभाग क्र.३, सातारा तसेच सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतच्या कण्हेर कालवे विभाग क्र.२, करवडी अंतर्गतचा कण्हेर कालवा उपविभाग क्र.११, नागठाणे या बांधकाम कार्यप्रकारातील ३ उपविभागीय कार्यालयांचे सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरण करुन कोयना सिंचन विभाग, कोयनानगर या विभागांतर्गत कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- उपरोक्त विभागांतर्गत १० शाखांपैकी नवीन ६ शाखा पदांशिवाय निर्माण करुन अस्तित्वातील ४ शाखा पदांसह कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- प्रपत्र-ड मध्ये दर्शविल्यानुसार बांधकाम कार्यप्रकारातील उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त रुपांतरणामुळे निर्माण होणाऱ्या विभाग, उप विभाग व शाखा इ. कार्यालयांची रचना **प्रपत्र-"अ", "ब", "क" व "ड"** प्रमाणे राहील.

२. उपरोक्त रुपांतरीत होणाऱ्या विभाग/ उप विभाग कार्यालयांना खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) या बांधकाम कार्यप्रकारातील विभाग व उप विभाग कार्यालयांची संपूर्ण आस्थापना मंजूर पदांसह रुपांतरीत सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारातील विभाग व उप विभाग कार्यालयास वर्ग करण्यात यावी. तसेच, रुपांतरीत करण्यात आलेल्या कार्यालयांना

आवश्यक असलेली पदे त्या पदांमधूनच वापरण्यात यावीत. सद्य:स्थितीत कोणतीही नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाहीत.

आ) उपलब्ध रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांकडून समकक्ष वेतनश्रेणीतील पदांची कामे अतिरिक्त कार्यभार देवून करुन घेता येतील.

इ) वर्गीकरण / सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग, उपविभाग व शाखा कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय, आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/ ८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च १९८४ मधील तरतूदीनुसार, संबंधित विभागांचे “कार्यकारी अभियंता” यांना आहरण व संवितरण अधिकारी व “अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा” हे या कार्यालयांचे नियंत्रण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

४. या रुपांतरीत कार्यालयांसाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित होईपर्यंत वेतन व वेतनेतर प्रयोजनावरील खर्च शासन निर्णय दिनांक १०/६/२०१६ सोबतच्या प्रपत्र-ब मध्ये नमूद केल्यानुसार कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे या कार्यालयाच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. उपरोक्त नमूद केलेली कार्यालये मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे प्रादेशिक विभागांतर्गत पुणे विभागामध्ये दिनांक १/६/२०१७ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी.

रुपांतरीत केलेल्या विभाग/उपविभागातील अस्तित्वातील कार्यभार इतर कार्यालयांकडे सोपविण्याबाबतचे आदेश मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे व मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे यांनी स्वतंत्रपणे निर्गमित करावेत.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर/ ८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१५१६३७५९७०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.15 16:40:37 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४. मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
६. मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
७. प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१२. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक
१४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१५. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे
१७. मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे
१८. सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१९. अधीक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा
२०. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
२१. अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
२२. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२३. कार्यकारी अभियंता, कण्हेर विकास विभाग, सातारा
२४. कार्यकारी अभियंता, धोम पाटबंधारे विभाग, सातारा
२५. कार्यकारी अभियंता, नीरा उजवा कालवा विभाग, फलटण
२६. कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर
२७. कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र.२, करवडी
२८. कार्यकारी अभियंता, टेंभू उपसा सिंचन प्रकल्प विभाग, ओगलेवाडी, कराड
२९. सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३०. कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ .

(शासन निर्णय क्रमांक: आढावा २०१७/प्र. क्र.१/२०१७/आ.(प्रशि), दिनांक : १२ मे, २०१७ सोबतचे **प्रपत्र-अ**)

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे प्रदेश / मंडळीय नियंत्रण | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार तसेच प्रदेश / मंडळीय नियंत्रण |
|---|---|---|
| प्रादेशिक कार्यालय | मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे |
| मंडळ कार्यालय → | सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा (बांधकाम) | सातारा सिंचन मंडळ, सातारा (सिंचन) |
| **विभाग →** | **(अ) कण्हेर विकास विभाग, सातारा (बांधकाम) →** | **अ) सातारा सिंचन विभाग, सातारा (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** |
| मु.अ. (विप्र), पुणे अधिनस्त सा.पा.प्र.मं., सातारा अधिनस्त →<br>धोम बलकवडी प्रकल्प विभाग, वाई अंतर्गतचा | **१) धोम बलकवडी प्रकल्प उपविभाग क्र.३, वाई** (बांधकाम) → | **१) धोम बलकवडी सिंचन उप विभाग क्र.१, वाई (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** <u>अंतर्गत ४ नवीन शाखा पदांशिवाय</u><br>१) धोम बलकवडी व्यवस्थापन धरण शाखा, व्याहळी<br>२) भोर शाखा, भोर<br>३) खंडाळा शाखा क्र.१, खंडाळा<br>४) नागेवाडी शाखा, वाई |
| | **२) धोम बलकवडी प्रकल्प उपविभाग क्र.२, फलटण** (बांधकाम) → | **२) धोम बलकवडी सिंचन उपविभाग क्र.२, फलटण (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** <u>अंतर्गत ४ नवीन शाखा पदांशिवाय</u><br>१) खंडाळा (पारगांव) शाखा क्र.२, खंडाळा<br>२) खंडाळा (पारगांव) शाखा क्र.३, खंडाळा<br>३) फलटण शाखा क्र.३, फलटण<br>४) फलटण शाखा क्र.४, फलटण |
| मु.अ. (विप्र), पुणे अधिनस्त सा.पा.प्र.मं., सातारा अधिनस्त →<br>कण्हेर विकास विभाग, सातारा अंतर्गतचा उपविभाग → | **३) कण्हेर भूविकास उप विभाग, रहिमतपूर** (बांधकाम) → | **३) उपसा सिंचन उप विभाग क्र.१, रहिमतपूर (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)**<br><u>अंतर्गत ४ नवीन शाखा पदांशिवाय</u><br>१) कवठे केंजळ शाखा क्र.१, वाई<br>२) वसना शाखा क्र.२, कोरेगांव<br>३) वांगना शाखा क्र.३, कोरेगांव<br>४) वांगना शाखा क्र.४, कोरेगांव |

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे प्रदेश / मंडळीय नियंत्रण | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार तसेच प्रदेश / मंडळीय नियंत्रण |
|---|---|---|
| मु.अ. (जसं), पुणे अधिनस्त सा.सिं.मं., सातारा अधिनस्त → धोम पाटबंधारे विभाग, सातारा अंतर्गतचे उपविभाग → | **४) धोम पाटबंधारे उप विभाग क्र.१, वाई** (सिंचन अस्तित्वातील) → | **४) धोम पाटबंधारे उप विभाग क्र.१, वाई** (सिंचन अस्तित्वातील)<br>अंतर्गत अस्तित्वातील ४ शाखा पदांसह<br>१) धोम पाटबंधारे शाखा, वाई<br>२) धोम पाटबंधारे शाखा क्र.३, पाचवड<br>३) धोम पाटबंधारे शाखा क्र.३, आनेवाडी<br>४) धोम पाटबंधारे शाखा क्र.४, आनेवाडी |
| | **५) धोम पाटबंधारे उपविभाग क्र.२,सातारा** (सिंचन अस्तित्वातील) → | **५) धोम पाटबंधारे उपविभाग क्र.२, सातारा** (सिंचन अस्तित्वातील) अंतर्गत अस्तित्वातील ४ शाखा पदांसह<br>१) धोम पाटबंधारे शाखा, भूईंज<br>२) धोम पाटबंधारे शाखा, शिवथर<br>३) धोम पाटबंधारे शाखा, सातारा रोड<br>४) धोम पाटबंधारे शाखा, त्रिपुटी |
| | **६) धोम पाटबंधारे उपविभाग, कोरेगांव** (सिंचन अस्तित्वातील) → | **६) धोम पाटबंधारे उपविभाग, कोरेगांव** (सिंचन अस्तित्वातील) अंतर्गत अस्तित्वातील ३ शाखा पदांसह<br>१) धोम पाटबंधारे शाखा क्र.१, कोरेगांव<br>२) धोम पाटबंधारे शाखा क्र.२, कोरेगांव<br>३) धोम पाटबंधारे शाखा क्र.३, रहिमतपूर<br>(रहिमतपूर शाखा क्र.१ चे कार्यक्षेत्र जोडून) |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.15 16:40:53 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

(शासन निर्णय क्रमांक: आढावा २०१७/प्र. क्र.१/२०१७/आ.(प्रशि), दिनांक : १२ मे, २०१७ सोबतचे

**प्रपत्र-ब**)

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे प्रदेश / मंडळीय नियंत्रण | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार तसेच प्रदेश / मंडळीय नियंत्रण |
|---|---|---|
| प्रादेशिक कार्यालय | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे |
| मंडळ कार्यालय → | सातारा सिंचन मंडळ, सातारा (सिंचन) | सातारा सिंचन मंडळ, सातारा (सिंचन) |
| **विभाग →** | **(अ) धोम पाटबंधारे विभाग, सातारा (सिंचन) →** | **(अ) कृष्णा सिंचन विभाग, सातारा (सिंचन)** |
| मु.अ. (जसं), पुणे अधिनस्त सा.सिं.मं., सातारा अधिनस्त → धोम पाटबंधारे विभाग, सातारा अंतर्गतचे उपविभाग → | **१) कण्हेर पाटबंधारे उपविभाग क्र.१, सातारा** (सिंचन अस्तित्वातील) → | **१) कण्हेर पाटबंधारे उपविभाग क्र.१, सातारा (सिंचन)** अंतर्गत अस्तित्वातील ५ शाखा पदांसह<br>१) कण्हेर धरण व्यवस्थापन शाखा, वेण्णानगर<br>२) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.१, सातारा<br>३) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.२, सातारा<br>४) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.३, गोजेगांव<br>५) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.१, बोरगाव |
| | **२) आरफळ पाटबंधारे उपविभाग, मसूर** (सिंचन अस्तित्वातील) → | **२) आरफळ पाटबंधारे उपविभाग, मसूर (सिंचन)** अंतर्गत अस्तित्वातील ३ शाखा पदांसह<br>१) आरफळ पाटबंधारे शाखा क्र.३, मसूर<br>२) कृष्णा नदी उपसा सिंचन शाखा, उंब्रज<br>३) आरफळ पाटबंधारे शाखा क्र.१, रहिमतपूर (धोम पाटबंधारे उपविभाग, कोरेगांव कडून वर्ग) |
| | **३) मध्यम प्रकल्प उप विभाग क्र.९, वडूज** (सिंचन अस्तित्वातील) → | **३) मध्यम प्रकल्प सिंचन उप विभाग, वडूज (सिंचन)** अंतर्गत अस्तित्वातील २ शाखा पदांसह<br>१) वडूज शाखा, वडूज<br>२) आंबवडे शाखा, आंबवडे |
| मु.अ. (जसं), पुणे अधिनस्त पुणे पाट. मंडळ, पुणे अधिनस्त → नीरा उजवा कालवा विभाग, फलटण | **४) सातारा पाटबंधारे उप विभाग, गोंदवले, मुख्या.दहिवडी** (सिंचन अस्तित्वातील) → | **४) सातारा पाटबंधारे उप विभाग, गोंदवले, मुख्या.दहिवडी (सिंचन)** अंतर्गत अस्तित्वातील ३ शाखा पदांसह<br>१) गोंदवले शाखा, गोंदवले<br>२) खटाव शाखा, खटाव |

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे प्रदेश / मंडळीय नियंत्रण | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार तसेच प्रदेश / मंडळीय नियंत्रण |
|---|---|---|
| अंतर्गतचा उपविभाग → | | ३) रेवडी शाखा, रेवडी |
| मु.अ. (विप्र), पुणे अधिनस्त सा.पा.प्र.मं., सातारा अधिनस्त → कण्हेर विकास विभाग, सातारा अंतर्गतचे उपविभाग → | **५) कृष्णा शेतचारी अस्तरीकरण उपविभाग, सातारा** (बांधकाम) → | **५) उरमोडी सिंचन व्यवस्थापन उपविभाग, सातारा (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** अंतर्गत ५ शाखांपैकी ३ नवीन शाखा पदांशिवाय व कण्हेर पाटबंधारे उपविभाग क्र.१, सातारा अंतर्गतच्या २ अस्तित्वातील शाखा पदांसह वर्ग<br>१) उरमोडी धरण शाखा क्र.१, सातारा (नवीन)<br>२) वाठार किरोली सिंचन शाखा, वाठार किरोली (नवीन)<br>३) उरमोडी सिंचन शाखा, सातारा (ल.पा.व को.प.बंधारे) (नवीन)<br>४) कण्हेर पाटबंधारे शाखा क्र.५, बोरगांव (अस्तित्वातील)<br>५) पाटबंधारे शाखा क्र.१, क्षेत्र माहुली (अस्तित्वातील) |
| | **६) दुष्काळी भाग लघु पाटबंधारे (सर्वे) उपविभाग क्र.१, वडुज** (बांधकाम) → | **६) उरमोडी सिंचन उपविभाग, वडुज (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** अंतर्गत २ नवीन शाखा पदांशिवाय<br>१) उरमोडी खटाव शाखा क्र.१, वडुज<br>२) उरमोडी खटाव शाखा क्र.२, वडुज |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce263 68b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.15 16:41:06 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

(शासन निर्णय क्रमांक: आढावा २०१७/प्र. क्र.१/२०१७/आ.(प्रशि), दिनांक : १२ मे, २०१७ सोबतचे **प्रपत्र-क**)

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार |
|---|---|---|
| प्रादेशिक कार्यालय | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे |
| मंडळ कार्यालय → | सातारा सिंचन मंडळ, सातारा (सिंचन) | सातारा सिंचन मंडळ, सातारा (सिंचन) |
| **विभाग →** | **(अ) कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर (सिंचन) →** | **अ) कोयना सिंचन विभाग, कोयनानगर, (सिंचन)** |
| मु.अ. (जसं), पुणे अधिनस्त सा.सिं.मं., सातारा अधिनस्त → कोयना धरण व्यवस्थापन विभाग, सातारा अंतर्गतचे उपविभाग → | **(१) कोयना धरण व्यवस्थापन उपविभाग, कोयनानगर** | **१)कोयना धरण व्यवस्थापन उपविभाग, कोयनानगर** |
| | **(२) कोयना रस्ते व इमारती उपविभाग, कोयनानगर** | **२) कोयना रस्ते व इमारती उपविभाग, कोयनानगर** |
| | **(३) कोळकेवाडी धरण व्यवस्थापन उपविभाग, अलोरे** | **३)कोळकेवाडी धरण व्यवस्थापन उपविभाग, अलोरे** |
| | **(४) कोयना बांधकाम उपविभाग क्र.२ (अ), कोयनानगर** | **४)कोयना बांधकाम उपविभाग क्र.२ (अ), कोयनानगर** |
| | **(५) कोयना उपकरण उपविभाग, कोयनानगर** | **५)कोयना उपकरण उपविभाग, कोयनानगर** |
| | **(६) कोयना पुनर्वसन उपविभाग क्र.२, सातारा (बांधकाम)** | **६)पाटण सिंचन उपविभाग क्र.१, सातारा (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** अंतर्गत २ नवीन शाखा पदांशिवाय<br>१) करवडी शाखा क्र.१, करवडी<br>२) करवडी शाखा क्र.२, करवडी |
| | **(७) कोयना पुनर्वसन उपविभाग क्र.३, सातारा (बांधकाम)** | **७)कोयना सिंचन उपविभाग क्र.१, सातारा (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** पाटबंधारे उपविभाग क्र.१, ओगलेवाडी अंतर्गतच्या ४ अस्तित्वातील शाखा पदांसह वर्ग<br>१) कोयनानगर शाखा, कोयनानगर<br>२) पाटण शाखा, पाटण<br>३) तळमावले शाखा, तळमावले<br>४) विहे शाखा, विहे |

| कार्यालयाचे स्वरुप (रुपांतरण/वर्ग करण्यासाठी प्रस्तावित कार्यालय ज्या कार्यालयाधिनस्त आहे त्या कार्यालयाचे नाव) | अस्तित्वातील विभाग/उपविभाग कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार | रुपांतरीत कार्यालयाचे नाव व कार्यप्रकार |
|---|---|---|
| मु.अ. (विप्र), पुणे अधिनस्त सा.पा.प्र.मं., सातारा अधिनस्त → कण्हेर कालवे विभाग क्र.२, सातारा अंतर्गतचा उपविभाग → | **(८)कण्हेर कालवा उप विभाग क्र.११, नागठाणे** (बांधकाम) → | **८)तारळी सिंचन उप विभाग, नागठाणे (सिंचन व्यवस्थापनासाठी रुपांतरीत)** अंतर्गत ४ नवीन शाखा पदांशिवाय<br>१) तारळी धरण शाखा क्र.१, तारळी<br>२) तारळी उपसा सिंचन योजना शाखा क्र.२, करवडी<br>३) तारळी उपसा सिंचन योजना शाखा क्र.३, करवडी<br>४) तारळी व उत्तरमांड शाखा, तारळी |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.15 16:41:18 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

(शासन निर्णय क्रमांक: आढावा २०१७/प्र. क्र.१/२०१७/आ.(प्रशि), दिनांक : १२ मे, २०१७ सोबतचे

**प्रपत्र-ड)**

**सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा व सातारा सिंचन मंडळ, सातारा या मंडळांतर्गतचे बांधकाम कार्यप्रकारातील उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात होणारे प्रस्तावित बदल**

| अ.क्र. | वर्ग होणाऱ्या उपविभागीय कार्यालयांचे सध्याचे मंडळ व विभागीय कार्यालयाचे नांव | वर्ग होणारे उपविभागीय कार्यालयांचे नांव | बदलानंतरचे मंडळ व विभागीय नियंत्रण |
|---|---|---|---|
| १ | सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतच्या कण्हेर विकास विभाग, सातारा अधिनस्त उपविभागीय कार्यालये | कण्हेर भूविकास उपविभाग (नवीन), सातारा | सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गतच्या धोम बलकवडी प्रकल्प विभाग, वाई अंतर्गत धोम बलकवडी प्रकल्पाच्या भूविकास भाग-१ कामासाठी वर्ग |
| २ | | ताकारी भू-विकास उपविभाग क्र.१, कडेपूर, जि.सांगली | सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत ताकारी पंपगृह विभाग क्र.१, देवराष्ट्रे, जि.सांगली यांचेकडे ताकारी प्रकल्पाच्या भू-विकास भाग-१ कामासाठी वर्ग |
| ३ | | म्हैसाळ भू-विकास उपविभाग क्र.२, म्हैसाळ, जि.सांगली | सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत म्हैसाळ पंपगृह विभाग क्र.१, म्हैसाळ जि.सांगली यांचेकडे म्हैसाळ प्रकल्पाच्या भू-विकास भाग-१ कामासाठी वर्ग |
| ४ | | कण्हेर शेतचारी अस्तरीकरण उपविभाग, कोरेगांव | सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गत कण्हेर कालवा विभाग क्र.२, करवडी, जि.सातारा यांचेकडे तारळी व उरमोडी प्रकल्पाच्या भूविकास भाग-१ कामासाठी वर्ग |
| ५ | सातारा सिंचन मंडळ, सातारा अंतर्गतच्या कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर अंतर्गतचा उपविभाग | कोयना पुनर्वसन उपविभाग क्र.१, कोयनानगर | सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा अंतर्गत कण्हेर कालवा विभाग क्र.२, सातारा यांचेकडे पुनर्वसन कामासह वर्ग |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.05.15 16:41:32 +05'30'

(वि. का. चौधरी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन